कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन आदेश क्रमांकः आपना-२०१४/प्र.क्र.२००/पापु-१५
गो.ते.रुग्णालय संकुल,७ वा माळा
लो.टि.मार्ग,क्रॉफड मार्केट,मुंबई-४०० ००१
तारीख: ३/१/२०१५

संदर्भ:-

१) पा.पु.व स्व.वि. शासन निर्णय क्र. आपना-४५०३/प्र.क्र.१०१/पापु-१५, दि.२७/९/२००५ तसेच समक्रमांक दिनांक १२/१/२००६,दिनांक ४/४/२००६ व दिनांक ६/६/२००६.
२) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र. प्रशासन/ आस्था-१/ परिविक्षा कालावधी/कभू/ ६००/२०१४,दिनांक १२ ऑगस्ट, २०१४
३) संचालक,भू.स.वि.यं.,पुणे यांची क्र. प्रशासन /आस्था-२/गो.अ./प्र.क्र.०८/२०१३-१४/ ६८८/२०१४, दिनांक २४ सप्टेंबर,२०१४ तसेच ८८३/२०१४, दिनांक २० डिसेंबर, २०१४ ची पत्रे.

प्रस्तावना:-

संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील विचाराधिन कनिष्ठ भूवैज्ञानिकांची कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) या पदावर संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद शासन निर्णयान्वये नामनिर्देशनाने दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता नेमणूक करण्यात आली होती.तथापि, विहित कालावधीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्याने सदर कनिष्ठ भूवैज्ञानिकांच्या सेवा दिनांक ४ मे,२०१२ च्या शासन निर्णयान्वये समाप्त करण्यात आल्या होत्या.तद्नंतर सदर भूवैज्ञानिकांनी दिनांक ४ मे,२०१२ च्या शासन निर्णयाविरुध्द दाखल केलेल्या याचिकेमध्ये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक १२/१०/२०१२ व दिनांक ३१/१०/२०१२ रोजी दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने विचाराधिन कनिष्ठ भूवैज्ञानिकांच्या सेवा दिनांक ९/१/२०१३ च्या शासननिर्णयान्वये पुनर्स्थापित करण्यात आल्या होत्या.आता संदर्भाधिन क्र.२ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार सदर विचाराधिन कनिष्ठ भूवैज्ञानिकांचे कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब)या पदावरील परिविक्षा कालावधी समाप्त करण्याची कार्यवाही शासनाच्या विचाराधिन आहे.

शासन आदेश:-

उक्त प्रस्तावनेस अनुसरुन खालील तक्त्यात नमूद ३ कनिष्ठ भूवैज्ञानिकांचा कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) या पदाचा त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या परिविक्षा कालावधीतील कामाचा दर्जा योग्य त्या पात्रतेचा असल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या दिनांकापासून संपुष्टात आणण्यात येत असून त्यांच्या सेवा स्तंभ क्र. ५ मध्ये त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या दिनांकापासून पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ. क्र. | नाव | रुजु दिनांक | परिविक्षाधिन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | सेवा पुढे चालू ठेवण्याचा दिनांक | विहित विभागीय परिक्षा उत्तीर्ण (वि.प.उ.) आहे काय किंवा अहवाल समाधानकारक आहे काय | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.सी.एस. कुंभारे | २०/१०/२००५ | २२/४/२०१० | २३/४/२०१० | परीक्षा २००८, उत्तीर्णः- २२/४/२०१० | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |
| २ | श्री.एन.एम. बोरकर | २०/१०/२००५ | २२/४/२०१० | २३/४/२०१० | परीक्षा २००८, उत्तीर्णः- २२/४/२०१० | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |
| ३ | श्री. सचिन खोडे | २९/४/२००६ | २२/४/२०१० | २३/४/२०१० | परीक्षा २००८, उत्तीर्णः- २२/४/२०१० | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०२१६४४२६०१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.01.03 11:10:21 +05'30'

(महेश सावंत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

२. उपसंचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,कोकण/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती /नागपूर विभाग
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई /नागपूर, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
४. संबंधित सर्व कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) (संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे यांचेमार्फत)
५. निवडनस्ती (पापु-१५)